प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) घटकांतर्गत सन २०१९-२० या वर्षात सर्वसाधारण प्रवर्गासाठी दुसऱ्या हप्त्याचा रु.१३४८६ लक्ष निधी वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं-०११९/प्र.क्र.४१ (भाग-१)/१४अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: २० मार्च, २०२०

**संदर्भ**

१. केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.१७-३/२०१९-RFS-III, दि.२ मे, २०१९.
२. केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.१८-१२/२०१८-RFS-III, दि.२० ऑगस्ट, २०१९.
३. कृषि व पदुम विभागाचे शासन निर्णय क्रमांक- प्रकृसिं-०११९/प्र.क्र.४१/१४अे, दि.३० ऑगस्ट, २०१९
४. केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.१७-३/२०१९-RFS-III, दि.१७ ऑक्टोबर, २०१९
५. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक- प्रकृसिं-०११९/प्र.क्र.४१/१४अे, दि.६ नोव्हेंबर, २०१९
६. कृषि व पदुम विभागाचे शासन निर्णय क्रमांक- प्रकृसिं-०११९/प्र.क्र.४१(भाग-१)/१४अे, दि.११ नोव्हेंबर, २०१९
७. केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.१८-१२/२०१८-RFS-III, दि.१४ फेब्रुवारी, २०२०.
८. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र.कृ.आ/फलो-४/दुसरा हप्ता निधी वितरण/८३७०/२००/२०२०, दि.२८ फेब्रुवारी, २०२०

**प्रस्तावना:**

सन २०१५-१६ पासून, केंद्र पुरस्कृत सुक्ष्म सिंचन योजना, प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत-प्रति थेंब अधिक पिक (सुक्ष्म सिंचन) या घटकांतर्गत राबविण्यात येत आहे. यामध्ये केंद्र राज्य हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.१४ फेब्रुवारी, २०२० च्या आदेशान्वये, सन २०१९-२० या वर्षात प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक घटकाची अंमलबजावणी करण्यासाठी दुसऱ्या हप्त्याचा सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.११८९९ लक्ष, अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रु.१७८२ लक्ष व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी रु.१४१९ लक्ष असा एकूण रु.१५१०० लक्ष निधी वितरीत केला आहे. सदर निधीपैंकी सर्वसाधारण प्रवर्गाचा रु.११८९९ लक्ष व उपलब्ध निधीच्या प्रमाणात समरुप राज्य हिश्श्याचा रु.१५८७ लक्ष असा एकूण रु.१३४८६ लक्ष निधी आयुक्त,कृषी यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

१. प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाची सर्वसाधारण प्रवर्गासाठी सन २०१९-२० या वर्षात अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र हिश्श्याचा रु.११८९९ लक्ष (अक्षरी : रुपये

एकशे अठरा कोटी नव्व्याणव लक्ष फक्त) व समरुप राज्य हिश्श्याचा रु.१५८७ लक्ष (अक्षरी : रुपये पंधरा कोटी सत्त्याऐंशी लक्ष फक्त) असा एकूण रु.१३४८६ लक्ष (अक्षरी : रुपये एकशे चौतीस कोटी शहाऐंशी लक्ष फक्त) निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (बीडीएस) आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च खालील लेखाशिर्षाखालील सन २०१९-२० च्या मंजुर तरतुदीतून भागविण्यात यावा.

| केंद्र | राज्य |
|---|---|
| **मागणी क्र. डी-३**<br>२४०१, पिक संवर्धन<br>११३, कृषि अभियांत्रिकी<br>(००)(०७) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन)<br>(केंद्र हिस्सा ६०%) (सर्वसाधारण)<br>(२४०१२५०४), ३३ अर्थसहाय्य | **मागणी क्र. डी-३**<br>२४०१, पिक संवर्धन<br>११३, कृषि अभियांत्रिकी<br>(००)(२१) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन)<br>(राज्य हिस्सा ४०%) (सर्वसाधारण),<br>(२४०१A९९६), ३३ अर्थसहाय्य |

३. केंद्र हिश्श्याच्या निधीच्या प्रमाणात आवश्यक असणारा उर्वरित समरुप राज्य हिश्श्याचा निधी वितरणाचा शासन निर्णय स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल.

४. सदर निधी सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठी वापरण्यात यावा.

५. सदर निधीतून वितरीत करण्यात येणाऱ्या अनुदानाची रक्कम PFMS प्रणालीद्वारे लाभार्थ्यांच्या आधारसंलग्न बँक खात्यात जमा करण्यात यावी.

६. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रती थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या मार्गदर्शक सूचना, संदर्भाधीन दि.३० ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचना, अटी व शर्ती तसेच राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. मंजूर निधीचे जिल्हा निहाय वितरण करण्यास तसेच खर्चावर नियंत्रण ठेवण्यासाठी आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना राज्य नियंत्रक म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, सदर योजनेंतर्गत मंजूर केलेला निधी आहरीत व संवितरीत करण्याचे अधिकार कृषी आयुक्तालय स्तरावर सहायक संचालक, लेखा- १, जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८. केंद्र शासनाच्या, प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या प्रशासकीय खर्चाची रक्कम, मार्गदर्शक सूचनानुसार अनुज्ञेय बाबींवरच खर्च करण्यात यावी.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर शासन परिपत्रकातील अटींची पूर्तता कृषि आयुक्तालयाने करण्याच्या अधिन व वित्त विभागाने अनैपचारिक

संदर्भ क्र.६४/२०२०/व्यय-१, दि.१६मार्च, २०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२०१८०५०५७८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant
Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.03.20 18:09:34 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (कृषी),कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) सचांलक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव (कृषी) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
५) सचिव (जलसंधारण व रोजगार हमी योजना), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) सचिव (ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) जिल्हाधिकारी (सर्व)
८) सर्व संचालक, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
९) सर्व विभागीय कृषी सहसंचालक
१०) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)
११) सर्व उपविभागीय कृषी अधिकारी/सर्व तालुका कृषी अधिकारी
१२) सर्व मंडळ कृषी अधिकारी
१३) मा.मंत्री (कृषी/फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
१४) मा.राज्यमंत्री (कृषी/फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
१७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१८) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१९) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
२०) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी
२१) लेखा,कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२२) उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२३) सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई
२४) निवडनस्ती (१४-अे)